विशेष पोलीस महानिरीक्षक [प्रशिक्षण व खास पथके], महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना विभागप्रमुख म्हणून घोषित करणे.

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग,
शासन निर्णय क्रमांक-टिईएस०२९८/सीआर-४५/पोल-५अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक- १६ जून, १९९८

वाचा :- १] पोलीस महासंचालक यांचे पत्र क्रमांक- पोमसं/१६/ ७६६७/विपोमनि[प्र. शिक्षण व खास[ प्र.व खा.पथके] दिनांक-८.१०.९८

शासन निर्णय :- विशेष पोलीस महानिरीक्षक[प्रशिक्षण व खास पथके ] महाराष्ट्र राज्य, मुंबई या पदाला स्वतंत्र अधिकारीता असून स्वतंत्र प्रशासनय अनुदानः मंजूर आहे. त्यांच्या अखत्यारीत महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक व राज्यातील पोलीस प्रशिक्षण विद्यालये आहेत. त्यांच्या आस्थापना, प्रशिक्षण व त्यांचे पाठ्यक्रम, परीक्षा व इतर बाबींचे काम त्यांच्या अधिपत्याखाली चालते त्यांना सर्व विभागीय परीक्षा मंडळासाठी पदसिध्द अध्यक्ष करण्यात आले आहे. राज्यातील पोलीस अधिकारी व कर्मचाऱ्यांच्या विविध स्तरावर अर्हता परीक्षांच्या संबंधातील सर्व कामकाज त्यांना कार्यालयातील कर्मचाऱ्यांकडून करवून घ्यावे लागते. परीक्षा व प्रशिक्षण संदर्भातील वाढत्या संख्येने दाखल होणाऱ्या याचिकांचे परिच्छेद निहाय अभिप्राय तयार करणे व सादरकर्ता अधिकाऱ्यांशी संपर्क ठेवणे ही कामेही त्यांच्या निरिक्षणाखाली करण्यात येतात. अशाप्रकारे त्यांच्या कार्यकक्षा रुंदावल्या आहेत. तसेच त्यांना काही प्रकरणी तातडीने प्रशासकीय निर्णय घेणे आवश्यक ठरते. त्यामुळे त्यांना विभाग प्रमुख म्हणून जाहीर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. उपरोक्त परिस्थिती विचारात घेऊन वित्तीय नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उपविभाग-१ मधील परिशिष्टातील अ.क्र. १ नियम-२ अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकाराचा वापर करुन विशेष पोलीस महानिरीक्षक [प्रशिक्षण व खास पथके], महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना शासन विभाग प्रमुख म्हणून घोषित करीत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

[ प्र. वार्हिलकर ]
अवर सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

.............

GR-20020415131949000-0200

..२/-